GR-200407071233280001-0100

प्रकल्पग्रस्त अथवा त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्ती यांना शासकीय सेवेतील गट-क आणि गट-ड मधील पदांवर नियुक्ती देण्याबाबत अनुसरावयाची कार्यपध्दती.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्रमांकः प्रकल्प-१००१/१०९/प्र.क्र.१५४/२००१/१६-अ,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २३ ऑक्टोबर, २००२

संदर्भः- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःएईएम-१०८०/३५/१६-अ,दि.२१.१.८०
२) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक आरपीए-१०९३/प्र.क्र.१३९/र-१, दि.२२.९.९३.
३) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्रमांकःएसआरव्ही-१०९४/१००४/प्र.क्र.३०/ १६-अ, दि.१७.११.९४
४) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्रमांकःप्रानिमं-१२९६/प्र.क्र.१४९/९६/१३-अ, दिनांक ३.१.९७.
५) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.:प्रकल्प-१०००/प्र.क्र.२७/२०००/१६-अ, दि.१३ .९. २०००.
६) शासन परिपत्रक, क्रमांकःप्रकल्प-१००१/१०९/प्र.क्र.१३/२००१/१६-अ, दि.७.४.२००१.

## शासन परिपत्रक

प्रकल्पग्रस्त किंवा त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती यांना शासकीय सेवेत गट क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदे वगळून) व गट ड मधील पदांवर नियुक्ती देण्याचे अधिकार नियुक्ती प्राधिका-यांना असल्यामुळे या संबंधात जिल्हाधिकारी यांच्या कार्यालयात असलेल्या प्रकल्पग्रस्तांच्या प्रतिक्षा यादीतील ज्येष्ठतेनुसार नियुक्त्या दिल्या जात नाहीत, असे शासनाच्या निदर्शनास आल्यानंतर दि.३.१.९७ च्या शासन परिपत्रकामध्ये अंशतः बदल करुन नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी प्रकल्पग्रस्त उमेदवाराच्या परस्पर नियुक्त्या करु नयेत, अशा सूचना दि.१३.९.२००० च्या परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत. या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे रिक्त असलेल्या पदांपैकी प्रकल्पग्रस्तांमधून भरावयाच्या पदासाठी मागासवर्गीयांच्या आरक्षणाला बाधा येणार नाही, याची दक्षता घेवून संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीतील उमेदवाराची मागणी करावयाची असून, जिल्हाधिकारी कार्यालयाने प्रकल्पग्रस्त उमेदवारांच्या प्रतीक्षा यादीतून आवश्यक उमेदवारांची जेष्ठतेनुसार शिफारस संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांना करावयाची आहे.

२. नियुक्ती प्राधिका-यांनी प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्तीसाठी संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे उमेदवारांची मागणी करावयाची आहे. तथापि काही नियुक्ती प्राधिकारी राज्य स्तरावर तसेच विभागीय स्तरावर असल्यामुळे या नियुक्ती प्राधिका-यांनी कोणत्या जिल्हाधिकारी कार्यालयाकडून प्रकल्पग्रस्त उमेदवारांची नावे मागवावीत याबाबत काही कार्यालयाकडून विचारणा करण्यात आल्या होत्या. तसेच काही प्रकल्पग्रस्त व्यक्तींनी ते रहात असलेल्या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीतून दुस-या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीमध्ये नाव हस्तांतरीत करण्यास मान्यता दयावी अशी विनंती केली होती. याबाबत विचार करून पुढील प्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

अ) राज्य स्तरावरील व विभागीय स्तरावरील नियुक्ती प्राधिका-यांनी गट क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदे वगळून) व गट ड मधील पदांवर नियुक्त्या करताना विहित आदेशांद्वारे ते जी पध्दती अवलंबवितात (उदा. जाहिरात देणे, लेखी परीक्षा घेणे, मुलाखती घेणे इ.) तीच पध्दती प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्त्यांसाठी अवलंबवावी. यासाठी गुणवत्ता यादी तयार झाल्यावर नियुक्त्या करताना प्रकल्पग्रस्तांना शासनाने विहित केलेले सर्वोच्च प्राथम्य राहील याची खबरदारी घेण्यात यावी. राज्यातील कोणत्याही जिल्हयातील प्रकल्पग्रस्त उमेदवार नियुक्तीसाठी राज्य स्तरावरील कार्यालयांमध्ये अर्ज करू शकतील. तथापि विभागीय स्तरावरील कार्यालयामध्ये नियुक्त्या करताना नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी त्या विभागांर्तगत असलेल्या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांचाच विचार करावा. यासाठी विशिष्ट विभागांर्तगत असलेल्या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तच

ब) प्रकल्पग्रस्त व्यक्ती एका जिल्हयातून दुस-या जिल्हयात काहीना काही कारणाने स्थलांतरीत होणार असेल व या व्यक्तीची एका जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीतून दुस-या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीत नाव हस्तांतरीत करण्याची मागणी असेल तर त्या व्यक्तीचे नाव ज्या जिल्हयात हस्तांतरीत करावयाचे आहे त्या जिल्ह्यातील प्रतीक्षा यादी मध्ये शून्य जेष्ठतेवर (संबंधित व्यक्तीच्या अर्जाच्या दिनांकारोजी यादीमध्ये दर्शविलेल्या शेवटच्या अनुक्रमानंतर ) नोंदविण्यात यावे. असे करतांना मूळ जिल्ह्याच्या यादीतील सदर प्रकल्पग्रस्तांचे नाव कमी करण्यात आले आहे याची खात्री करून घ्यावी. मात्र प्रकल्पग्रस्तांस / त्याच्या नामनिर्देशितास नोकरी मिळाल्यानंतर ही हस्तांतरणाची सवलत मिळणार नाही. नाव हस्तांतरीत करण्याची सवलत फक्त एकदाच देण्यात यावी.

४. हे आदेश वित्त विभागाच्या पदनिर्मीती/पदभरती अतिरिक्त संवर्ग कक्ष याबाबत दि.१०.९.२००१ रोजीच्या शासन निर्णयाच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत. तसेच हे आदेश या परिपत्रकाच्या दिनांकापासून लागु राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( द. दा. देशपांडे )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
४) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव.
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव.
* ७) प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई.
* ८) प्रबंधक,उच्च न्यायालय,अपिल शाखा,मुंबई.
* ९) प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई.
* १०) प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त,मुंबई.
* ११)सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.
* १२) सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
* १३) सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई.
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) संचालक ,समाजकल्याण पुणे.
१७) आयुक्त,आदिवासी विकास ,नाशिक.
१८) संचालक,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे.
१९) संचालक,सेवायोजन,मुंबई
२०) सहायक आयुक्त,(मागासवर्ग कक्ष),सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये.
२१) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख.
२३) सर्व मंत्रालयीन विभाग.
२४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
२५) निवड नस्ती.

* (पत्राने)

A:\Project affected-11
एच-893(4500-10-02)1अ.

GR-20040707124134001-0100

प्रकल्पग्रस्तांना शासकीय / निमशासकीय सेवेत गट-क व गट-ड मधील पदांवर नियुक्ती देतांना उच्चतम वयोमर्यादा शिथिल करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्रमांक : विसआ-१००१/६०/प्र.क्र.१३९/०१(भाग-१)/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मे, २००३

संदर्भ :- १) सा.प्र.वि.शा.नि.,क्र.एसआरव्ही-१०७८/पीएपी/१२, दि. २२/९/१९७८.
२) सा.प्र.वि.शा.नि, क्र.एइएम-१०८०/३५/१६-अ, दि. २१/१/१९८०.
३) सा.प्र.वि.शा.नि, क्र.एसआरव्ही-१०९४/१००४/प्र.क्र.३०/१६-अ,दि. १७/११/९४.
४) सा.प्र.वि.शा.नि, क्र.एइएम-१०९९/प्र.क्र.४७/९९/१६-अ, दि. २४/२/२०००.

**शासन निर्णय :-**

प्रकल्पग्रस्त किंवा त्यांच्या कुटुंबातील व्यक्ती यांना बृहन्मुंबई बाहेरील शासकीय व निमशासकीय सेवांमधील गट-क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) व गट-ड मधील पदांवर नियुक्त्या देताना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये उच्चतम वयोमर्यादा तीन वर्षांनी शिथिल करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये बृहन्मुंबईतील शासकीय व निमशासकीय कार्यालयातील गट-ड मधील पदांवरील प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्त्यांसाठीही ही सवलत देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्पग्रस्तांना शासकीय व निमशासकीय सेवांमध्ये नियुक्त्या देण्यासाठी एकूण संवर्ग बळाच्या ५% पदांवर सर्वोच्च प्राधान्य देण्यात आले असून संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्पग्रस्तांसाठी असलेल्या सर्वोच्च प्राधान्यक्रमात भूकंपग्रस्तांचाही समावेश करण्यात आला आहे.

२. प्रकल्पग्रस्तांना नियुक्त्यांच्या वेळी उच्चतम वयोमर्यादेत देण्यात आलेल्या शिथिलतेमध्ये वाढ करण्याच्या मागण्या तसेच विधीमंडळाच्या सन २००१ मधील दुसऱ्या अधिवेशनात विधानसभेत देण्यात आलेले आश्वासन यांचा विचार करुन सदर वयोमर्यादा आणखी शिथिल करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

३. शासन असे आदेश देत आहे की, प्रकल्पग्रस्त किंवा त्यांच्या कुटुंबातील व्यक्ती यांच्या गट-क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) व गट-ड मधील पदांवर नियुक्त्या करताना उच्चतम वयोमर्यादा खुल्या प्रवर्गासाठी ३५ वर्षापर्यंत व मागासवर्गीयांसाठी ४० वर्षापर्यंत शिथिल करण्यात यावी.

४. हे आदेश शासकीय सेवा, शासकीय मंडळे, महामंडळे, महानगर पालिका, नगर पालिका, जिल्हा परिषदा आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार राज्य शासनाला आहे, अशी इतर प्राधिकरणे, सेवा व संस्था यामधील नियुक्त्यांसाठी लागू राहतील.

५. हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(दे.त्र्यं. कुमावत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
* ७) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*८) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* ९) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* १०) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* ११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*१२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
* १३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) सर्व मंत्रालयीन विभाग,
१७) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
१८) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासन,
१९) निवड नस्ती.

* (पत्राने)

------

रोटा/एच-323(4500-6-03).

98. - 81

GR-20040707124323001-0100

Employment of Freedom Fighters in Government Service.

GOVERNMENT OF MAHARASHTRA.
General Administration Department.
Circular Memorandum No.CNS-1065/4652-J.
Sachivalaya, Bombay-32 (BR), 12th October 1965.
21st Ashvina, 1887.

CIRCULAR MEMORANDUM.

The question of giving certain concessions to freedom fighters was under the consideration of Government for some time past. Government has now decided to accord to them the following concessions in the matter of recruitment to Class III and IV posts in Government offices which are not required to be filled in by the appointment of candidates selected by the State Public Service Commission viz:-

(1) These persons may be considered for appointment to Class III and IV posts in Government service on the basis of their applications received directly without requiring them to come through the employment exchanges.

(2) In making appointments to Class III and Class IV posts, the appointing authorities should give preference to these persons, if they are otherwise found suitable.

(3) Such of these persons as possess the prescribed qualifications but are over-age, if otherwise considered suitable, may be appointed to Class III and Class IV posts subject to the sanction of Government being obtained in each case.

(4) Such of the persons as have studied upto S.S.C./Degree or Diploma Course but have not passed those or equivalent examinations may be appointed to Class III Services for which passing of the S.S.C./Degree or Diploma examination as the case may be, has been prescribed as a minimum qualification. The prescribed educational qualifications should be deemed to have been relaxed in their favour.

Note:- For the purpose of these orders "Freedom Fighters" mean those persons who have suffered imprisonment or detention of an aggregate period of not less than one month or who were fined Rs.100/- or more, or who died or were killed in action or in detention or were awarded capital punishment or became permanently incapacitated due to firing or lathi charge or lost their jobs or means of livelihood or part or whole of their property on account of their participation in the national movement for the emancipation of India.

2. For the purpose of claiming the foregoing concessions in respect of employment in Government service the persons concerned should produce a certificate issued by Government (General Administration Department) declaring them as "Freedom Fighters".

3. It is possible that some of the persons who are eligible for these concessions may not actually be able to avail themselves of them for reasons like old age, illness etc. Government is, therefore, pleased to direct that such persons viz. those who are eligible for the concessions but are unable owing to illness, disability or old age to take advantage of them, should be allowed to nominate a

P.T.O.

GCP.Rota/G.A.D.-H-827(7,500-10-65)

near relative who is solely dependent on them for taking advantage of the concessions. On such nomination being made the nominee should be held eligible for the concessions granted to the Freedom Fighters in the matter of recruitment to Government service.

4. These orders issue with the concurrence of the Finance Department vide that Department un-official reference No.17183/1926-VI, dated the 6th October 1965.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

K. P. NADKARNI,
Deputy Secretary to Government.

To

The Secretary to the Governor,
The Private Secretary to the Chief Minister,
*The Registrar, High Court, Appellate Side, Bombay,
*The Prothonotary and Senior Master, High Court, Bombay,
All other Heads of Departments and Heads of Offices under the several Departments of the Secretariat,
All Departments of the Secretariat,
The Director of Re-settlement and Employment, Bombay.

*By letter.

No. of 1965.

Copy forwarded for information and guidance to -

---------